भगवंताच्या आदेशान्वये नवनारायणांनी भूलोकात अवतार घेऊन लोकपयोगी कार्य करावे. दुःखीतांच्या, वांचितांच्या, पिडीतांच्या कल्याणास्तव कार्यरत असावे. भक्ती संप्रदायात वृद्धी करावी ही अपेक्षा ठेवून कलीयुगावर अंकुश ठेवण्यास साहाय्य करावे असा संकेत होता. नऊ पैकी आठ नारायण भूतलावर कार्यरत झाले. शेवटचा पिप्पलायन नारायण, भगीरथी तीरा जवळच्या कुशबेटात ब्रम्हबीज आणि प्रकृती बीजाच्या संयोग झाल्यामुळे पिप्पलायन नारायणाला संचार करता आला. पुढे गर्भवासाचा कालखंड पूर्ण झाल्यावर बालक जन्माला आले. सत्यश्रवा नावाच्या एका ब्राम्हणाने त्याचे पालनपोषण केले. पण खरा सूत्रधार ब्रम्हदेवपुत्र देवर्षी नारदमुनी. यांनीच सत्यश्रवाला हे सत्कृत्य करण्यासाठी प्रवृत्त केले होते. सत्यश्रवाकडे चर्पटीचे यथायोग्य शिक्षण होऊन तो शास्त्र पारंगत झाला आणि येथावकाश श्रीदत्तगुरूंचा अनुग्रह मिळविण्यासाठी मोठ्या चातुर्याने आणि हिकमतीने नारदमुनींनी त्यास सत्यश्रवापासून विलग केले. ते त्याच्या भल्यासाठीच होय! श्रीगुरु दत्तांच्या आदेशावरून चर्पटीनाथ तीर्थाटनासाठी निघून गेला.

श्रीदत्तांच्या आदेशांचे पालन करीत चर्पटीनाथ तीर्थाटन करीत आहेत. गया, प्रयाग, काशी, जगन्नाथपुरी, मल्लिकार्जुन, फणिपर्वत, रामेश्वर, कन्याकुमारी, बारा मल्हार, हिंगलाज माता, बारा ज्योतिर्लिंग, सप्त मोक्षपुऱ्या इत्यादी असंख्य तीर्थक्षेत्रांचे दर्शन घेत चर्पटीनाथांनी संपूर्ण हिंदुस्थानी उपखंडाला प्रदक्षिणा घालून तीर्थयात्रा पूर्ण केली. आता स्वर्गातील मणिकर्णिकेत आणि पाताळ लोकातील भोगावतीमध्ये स्नान करून तेथील तीर्थे पाहण्याची त्यांची इच्छा झाली.

चर्पटीनाथांनी बद्रिकाश्रमात जाऊन उमपतीचे दर्शन घेतले. व्यान प्रयोगाने मंत्रीत भस्म कपाळावर लावताच वायुवेगाने ते स्वर्गाकडे निघाले. मग त्यांनी आदित्य मंत्राचा जप करून मागेपुढे सूर्यतेज निर्माण केले. त्याच्या साथीने मार्गक्रमण करीत महेंद्रगिरी ओलांडला, शैल्य पर्वत शिखरावरील बर्फाचा गारठा अंगाला झोंबू लागला. तेव्हा सूर्याच्या उष्णतेने रक्षण केले. बर्फ वितळून पाणी झाले. स्वर्गामध्ये सर्वप्रथम चर्पटीनाथ सत्यलोकातील मेरू पर्वत शिखरावर उतरले. ब्रम्हदेवांपुढे जाऊन हात जोडून उभे राहिले, त्यांना वंदन केले. ब्रम्हदेवांनी विचारले, “योगाभ्यासी आपण कोण आहात?” त्यावेळी तेथे उपस्थित नारदमुनींनी समूळ कथा सांगून त्यांचा परिचय दिला. ब्राम्हदेवांनी नाथांना मांडीवर बसवून घेतले. मुख कुरवाळून गाळाचे चुंबन घेत विचारले, “पुत्रा चर्पटी! स्वर्गात कसे येणे केले?” चर्पटी म्हणाला, “तातश्री, नारदमुनींनी मला श्रीगुरुदत्तांच्या पायावर घातले. दत्तगुरूंनी मला अनुग्रह देऊन विद्या निपुण केले. त्यांच्या कृपेनेच आपल्या दर्शनासाठी येथपर्यंत येऊ शकलो.” ब्रम्हदेव म्हणाले, “येथे आलास हे अती उत्तम, आता काय इच्छा असेल ती सांगावी.” चर्पटी म्हणाला, “तातश्री! आपल्या दर्शनाची ओढ होती. तसेच मनकर्णीका नदीत स्नान करून स्वर्गातील तीर्थे पाहण्याची आणि त्यानंतर पाताळ लोकातील भोगावती नदीत स्नान करण्याचा मनोदय आहे.” ब्राम्हदेवांनी सहर्ष होकार दिला आणि आला आहेस तर एक संवत्सर त्याने तिथे राहावे आणि पर्वकाळात सर्वजणांसह मनकर्णीकेत जाण्याचा प्रस्ताव सांगितला. चर्पटीनाथ त्यांची आज्ञा प्रमाण मानून तिथे राहिले. तिथल्या वास्तव्यात नारदमुनी आणि चर्पटी क्षणभरही एकमेकांना सोडून राहत नव्हते. दरम्यानच्या काळात नारदमुनींच्या जुन्या स्मृती चाळावल्या गेल्या. एकदा श्री नारद अमरपुरीत गेले असतां त्यांना पाहून इंद्रदेव टवाळी करण्याच्या उद्धेशाने म्हणाले होते, “या! कळीचे नारद! यावे.” या खोचक थट्टेमुळे नारद फारच कोपले होते, मनात म्हणाले, “तशी वेळ तुझ्यावर लवकरच आणेन. मग कळीचा नारद कसा असतो ते कळेल!” असा मनोमन निश्चय करून ते निघून गेले होते. या घटनेला पुष्कळ काळ

लोटला होता. पण इंद्राची वर्मावर घाव घालणारी कृती नारद विसरले नव्हते. सांप्रत चर्पटीनाथ स्वर्गात पाहुणा म्हणून वावरत आहे. ती संधी साधून त्याच्या हातून इंद्राची मस्ती जिरवण्याचा विचार नारदांनी केला. एक दिवस ते चर्पटीनाथांना म्हणाले, “चर्पटी भाऊ! अमरपुरीतील नंदनवनात फेरफटका मारून यावे असे वाटते.” त्यावर चर्पटीने, “अवश्य दादा! चल आपण निघू या.” म्हणाला. चर्पटीच्या सावकाश चालण्याने मार्गात रखडपट्टी होऊ लागली तेव्हा नारद म्हणाले, “बंधुराज, अमरपुरीस जाणे येणे म्हणजे पुष्कळ मोठे अंतर आहे. असे संथ चालण्याने आपण केव्हा पोहोचणार आणि केव्हा परतणार?” चर्पटी नारदास म्हणाला, “अहो दादा! आम्ही मानव देहधरी आहोत, आमच्या चालण्याचा हाच वेग असणार, आपणाकडे काही चपळ गतीसाठी उपाय असेल तर त्यायोगे मला घेऊन जावे.” त्याच्या मागणीच्या पूर्ततेसाठी नारदाने चर्पटीला गमनकला शिकविली. नारदाला ही विद्या कमलापती श्रीविष्णूने शिकविली होती. त्या कलेच्या योगाने सूक्ष्म देहापासून स्थूल देहापर्यंत कुठून कुठेही क्षणात जाता येत असे. त्रिभुवनातील सकल घटना वृत्त दृष्टीस पडत असे. भूत, भविष्य, वर्तमानातील सर्व गुप्त आणि उघडपणे केलेली कृत्ये दृष्टीस पडत असत. अशी ही अद्भुत विद्या प्राप्त झाल्याने नाथांना आनंद झाला. मग दोघेही डोळयांची पापणी लावते ना लावते तोच नंदनवनात जाऊन पोहोचले. नंदनवनाचे निसर्गसौंदर्य अवर्णनीय होते. तऱ्हेतऱ्हेच्या वृक्षवेलींनी नटलेला सहस्त्र योजनांचा विस्तीर्ण परिसर, गगनचुंबी तरू, वेली, सुघंदी फुलांची झाडे, सर्व परिसरभर बहरलेला फळाफुलांचा सुगंध! त्यामुळे तेथील पाषाणसुद्धा सुगंधित झाले होते. ते पाहून चर्पटीनाथाचे मन हर्षभरीत झाले. आनंदीत होऊन ते बागडू लागले. तेथील अमृतफळे पाहून त्यांनी विचारले, “ज्येष्ठ बंधू! मी ही फळे खाऊ का?” नारदाने “खा, खा, हवी तेवढी खा. तुझा कुणी हात धरला आहे का?” मग दोघेही मन मानेल तशी फळे तोडून खाऊ लागले. फळातल्या बिया आणि साली काढून रस प्राशन करीत होते. या फांदीवरून त्या फांदीवर, एका झाडावरून दुसऱ्या झाडावरील रसाळ, पक्व फळे तोडीत होते. गळयात, हातात, कानात फुले माळली. बागेची नासधूस होऊ लागली. तेथून ते पुष्प वाटिकेत गेले. तेथील सुगंधी फुले तोडली. गळयात, हातात, कानात फुले माळली. काही खिशात आणि झोळीत भरून घेऊन गेले. ब्रम्हदेव पूजा करण्यासाठी बसले होते. त्यांच्या पुढ्यात ठेवून म्हणाले, “तातश्री, अरण्यात फिरत असतांना ही सुवासिक आणि सुंदर फुले मिळाली. आपल्या पूजेसाठी काही आणली आहेत.” अशा प्रकारे त्या बागेत जाऊन ते रोज नुकसानच करू लागले. अगदी उच्छादच मांडला होता. कोण नुकसान करतो ते सापडत नसल्याने बागेचे रक्षक माळी त्रस्त झाले होते.

एक दिवस रक्षकांनी गुप्त पळत ठेवली. नित्यपणे बागेत येणारे हे दोघे भाऊ आपल्या आवडीनुसार फळे, फुले तोडू लागली. पाळतीवर असलेल्या रक्षकांनी चर्पटीनाथांना पकडले, ते पाहून नारदमुनी मात्र तेथून त्वरित सटकले आणि त्यांनी धूम ठोकली. रक्षकांनी तर चर्पटीनाथांना जबरी मारहाण करायला सुरवात केली. त्यामुळे नाथसुद्धा चिडले. त्यांनी वाताकर्षण मंत्र टाकून सर्वांना गलीतगात्र केले. सर्व स्वर्गभूमीवर लोळत पडले. देहातील बळ संपले, डोळे पांढरे पडले. हातपाय भूमीवर खोडू लागले. मुखातून रक्ताच्या गुळण्या बाहेर पडू लागल्या. तळमळत, तडफड करीत जागच्या जागी घुसमट सहन करीत होते. हा तमाशा दूरवरून पहाणारे दुसरे बागरक्षक धावून आले. त्यांची ती विकलावस्था पाहून घाबरून गेले. पाहतात तर एक तेजस्वी बालक धीरोदात्तपणे उभा आहे. त्याचे ते तेजस्वी रूप आणि उग्र आवेश पाहून ते मागचीमागे पळून गेले. धावपळ करीत अमरपुरीत जाऊन इंद्रदेवाला म्हणाले, “देवराज! नंदनवनात एक तेजस्वी बालयोगी आला आहे, त्याने बाग रक्षकांचे प्राण घेतले असून त्याने निर्भयपणे बागेत उच्छाद मांडला बागेचे नुकसान करीत आहे. त्याच्यापुढे आमचा टिकाव लागणार नसल्याने आम्ही हे सर्व आपल्या कानावर घालण्यासाठी आलो

आहोत." देवेंद्राने देवगणांना आदेश दिला, "नंदनवनातल्या बागेत ताबडतोब जाऊन त्या दांडग्या मुलाला जेरबंद करून माझ्यापुढे हजर करा. जर त्याला आवरता आले नाही तर शास्त्रअस्त्रांचा वापर करून त्याचा पाडाव करा." अशी आज्ञा मिळताच त्वरेने सर्व देवगणांनी कुच केले. इंद्रदेवाने आदेश दिलेली ती नुसती सेना नव्हती तर सेनासागर होता. त्यांच्या हातात शस्त्रे लखलखत होती. अग्नीचा लोळ अंगावर यावा त्याप्रमाणे तो सेनासागर फुलबागे जवळ आला. चर्पटीनाथांनी त्यांना पहिले. रागाने लालेलाल होऊन त्यांनी झोळीतून भस्म चिमुट काढली आणि सज्ज होऊन त्यांच्या जवळ येण्याची वाट पाहत सावधपणे उभे राहिले. मनात विचार केला, "उगीच अनेक विद्या वापरून व्यर्थ श्रम कशाला करावा? सर्व अस्त्रांचे मुकुटमणी वाताकर्षण अस्त्र वापरून खेळच संपवून टाकू या!" मग त्यांनी वाताकर्षण भारीत भस्म चीमुटी देवगणांवर सोडताच, देव सैन्याचा श्वास बंद झाला. प्राण कासावीस होऊन एक एक योद्धा खाली कोसळू लागला. तोंडातून भडाभडा रक्ताचे पाट वाहू लागले. देह निष्प्राण झाल्यासारखे पडून राहिले. हातातील शस्त्रे गळून पडली. डोळे पांढरे पडले. पाणी आटल्यानंतर मासे तडफड करतात तशी संपूर्ण नंदनवनात देवसेना तडफड करीत होती.

देवराज इंद्रही अस्वस्थच होता. नंदनवनातील हकीगत जाणून घेण्यासाठी त्याने गुप्त हेर पाठविले होते. त्यांनी खबर आणली, "देवराज! अतिशय धक्कादायक आणि अविश्वासनीय वृत्त आहे. सर्व देवसेना धाराशायी पडली आहे. तो बालयोगी लहान दिसत असला तरीही भीमपराक्रमी आहे. काळाचाही प्राण घेईल असे त्याचे सामर्थ्य आहे. त्याच्या पराक्रमाने आजच महाप्रलय आल्याचा भास होतो आहे. काहीच क्षणात तो येथे येऊन तो आपल्याला सुद्धा लक्ष करण्याची शक्यता असल्याने आपण सावधान व्हावे." ते ऐकून इंद्र दचकला. त्याने आज्ञा केली, "माझा ऐरावत सिद्ध करा. मीच वज्राघाताने त्याचा पाडाव करतो." यावर गुप्तहेर म्हणाले, "देवराज उगीच संकटात उडी घेऊ नका. तो जोगी धनुष्याला बाण जोडीत नाही की हातात शस्त्र धरीत नाही. केवळ भस्म फुंकून विपरीत करणी करतो. त्यामुळे रणांगणावरील सर्व योद्धयाचे श्वास बंद होतात. पराक्रमी वीरसुद्धा गतप्राण होतात. तेथे तुमचे वज्र काय कामाचे? त्याची गुप्त विद्या काही करण्याची संधीच मिळू देत नाही. नाहक प्राण गमावण्यापेक्षा श्रीशंकराची मदत घेणे योग्य होईल. ते आले तरच देव उठतील नाहीतर सर्व मेल्यात जमा आहेत. तरी आपण युद्धाचा विचार सोडून श्रीशिवाकडे जावे." ते ऐकून देवराज त्वरित कैलासावर गेले.

श्री सदाशिव शिवगणांच्या मेळाव्यात बसले होते, तेवढ्यात देवराज इंद्र तेथे जाऊन पोहोचले. त्यांच्या चरणांवर माथा ठेवून म्हणले, "महाराज आदिनाथ! आपण मला अमरपुरीच्या सिंहासनावर देवराज म्हणून बसविले आहे, आपल्या कृपेने मी अनेक थोर दानवांचा संहार करून संकट निवारण केले आहे परंतु आता अंतिम घडी आली आहे. सर्व देव प्राणास मुकले आहेत, तुम्हाला हे सांगणारा मी एकटाच तेवढा वाचलो आहे. श्रीशिव थक्क होऊन म्हणाले, "देवेंद्रा! स्वर्गलोकावर हल्ला करणारा असा कोण पराक्रमी वीर आहे? आपण स्वतः पाहिलेत का? इंद्राने त्याला पहिले नव्हतेच म्हणून म्हणाला, "नाही, सदाशिवा! मी स्वतः नजरेने पहिले नाही. नंदनवन कुसुम वाटीकेचा नाश केला म्हणून मी सर्व देवांना पाठविले. त्यांचा प्राण नाश झाल्याचे गुप्त हेरांनी सांगितले म्हणून मी तसाच पळत आपणांकडे आलो आहे, आता तुम्हीच आमचे रक्षण करा महादेवा! प्रसंगाचे गांभीर्य ओळखून श्रीशिवाने गणांना आज्ञा केली की सत्वर सिद्ध होऊन कूच करावे. तसेच दुतांनाही श्री विष्णूंना पाचारण करण्यास सांगितले. त्याबरोबर विलंब करू नये असा ही निरोप पाठवून स्वतःही घाईने निघाले. श्री विष्णूंना निरोप पोहचविण्यासाठी दूत दौडत निघाले. शतकोटी शिवगणांसह अष्टभैरवांना घेऊन श्रीशिव नंदनवनात जाऊन थडकले. त्यांना पाहताच चर्पटीनाथांनी भस्म चिमुट काढून त्यावर

वाताकर्षण सिद्ध करून सोडले. त्यामुळे श्रीशिवासह सर्वांचे श्वास कोंडले. श्रीशिव, देवराज इंद्र, अष्टभैरव आणि शतकोटी शिवगण ढासळून पडले. हाहाकार उडाला. मुळांपासून वृक्ष उन्मळून पडावेत तसे ते पटापट पडून तडफड करीत होते. काहीच क्षणात मूर्च्छित होऊन निचेष्ट झाले. दूर अंतरावर दडून बसलेले नारद इंद्राची ती अवस्था पाहून मनातून हसून म्हणत होते, "बरे झाले! अहंकारी, उन्मत आणि गर्विष्ट माना खाली पडल्या!!"

श्री विष्णूला निरोप सांगण्यासाठी गेलेले शिवदूत वैकुंठात गेले आणि म्हणाले, "महाराज! अमरपुरी नंदनवनात कोणी एक तपस्वी बालक आला आहे आणि त्याने सर्व देवांना ठार केले असून एकटे देवराज इंद्र उरले असून ते श्रीशिवाच्या आश्रयाला गेले आहेत. त्यामुळे श्रीशिव सर्व गणांसह अष्टभैरवांना घेऊन त्याच्या सोबत युद्ध करावयास गेले आहेत. आपणही त्वरित त्यांना सहाय्य करण्यासाठी निघावे, असा श्रीशिवांचा निरोप आहे." ते ऐकताच छप्पन कोटी विष्णूगणांसह श्रीविष्णू गरुडावर स्वार होऊन त्वरित निघाले. त्यांनी तेथे जाऊन वेढा घातला पण श्रीशिव, शिवगण, देवराज आणि देवगण निपचित पडलेले पाहून श्रीविष्णू भयंकर कोपले. त्यांनी रणगर्जना केली, "आक्रमण! शस्त्र अस्त्रांनी शत्रूचा निःपात करा." विष्णूंनी सुदर्शन काढले, गांडीव (धनुष्य) काढून प्रत्यंचा लावली. कर्णभेदक टणत्कार केला. चर्पटीनाथांनी विचार केला, "हे सुदर्शन चक्र महापराक्रमी आहे तरी आपण प्रथमच सावध होऊन त्यावर उपाययोजना केली पाहिजे." मग त्यांनी मोहनास्त्र जप करून सुदर्शन चक्रावर सोडले. त्यामुळे सुदर्शन मोहून गेले. फिरण्याची गती कमी होऊन जडत्व आले. तशीच अवस्था धनुष्याची झाली. त्यानंतर नाथांनी वाताकर्षण अस्त्र सोडताच महापराक्रमी, शूर विष्णू सैन्याचा श्वास कोंडला. सर्वजण रक्त ओकीत खाली पडले. डोळे पांढरे पडून हातपाय घासू लागले. ते पाहून विष्णूंनी अतिचपळ, महास्त्र सुदर्शन सोडले, घोंगावात झोकावलेले महासुदर्शन चक्र नाथां भोवती गिरट्या घालत होते. अगोदरच ते मोहित झाले होते. मोहात पडलेल्या सुदर्शन शक्तीने विचार केला, "हा पिप्पलायन नारायण म्हणजे माझ्या स्वामींचा अंश आहे. एक प्रकारे माझा स्वामीच आहे, त्यांचा वध मी कसा करू? कदाचित ही माझीच परीक्षा असावी." असा विचार करीत सुदर्शनाने नाथांना नमन केले. नाथांनी उजव्या हाताचे बोट पुढे करताच, अलगदपणे हातावर विराजमान होऊन सुदर्शन शांत झाले. चक्रधारी चर्पटीनाथ प्रत्यक्ष विष्णूप्रमाणे भासू लागले. तो चमत्कार पाहून विष्णूसुद्धा थक्क झाले. ते चवताळून गदा घेऊन धावले. ते पाहून नाथांनी दुर्घट असे वाताकर्षण अस्त्र टाकले. श्वास बंद होऊन विष्णू गदेसह धडकन कोसळले. देहातील शक्ती नाहीशी झाली. शास्त्रअस्त्रे धुळीत पडली. चर्पटीनाथ विष्णुंजवळ निरखून पाहू लागले. त्यांच्या नजरेस कौस्तुभ मणी पडला. त्यांच्या मानत विचार आला की आपण हा आभुषणासाठी ठेवून घ्यावा. मग त्यांनी वैजयंतीमाला काढून गळयात घातली. रत्नमुकुट काढून डोक्यावर परिधान केला. शंख काढून घेतला. सुदर्शन तर अगोदरच घेतले होते. गदा काढून काखोटीस धरली. त्यानंतर श्रीशंकरा समीप गेले. त्यांचे कपालपात्र काढून झोळीत घातले. सर्वांना एकवार निरखून पहिले आणि गमनविधी द्वारे क्षणात सत्यलोकात ब्रम्हदेवासमोर जाऊन उभे राहिले.

हातात पांचजन्य, बोटात सुदर्शन. काखोटीत गदा, गळयात कौस्तुभ मण्यांची माळ, डोक्यावर रत्नमुकुट धारण कर्त्या चर्पटीला पाहून ब्रम्हदेवांना धक्काच बसला. या सर्व वस्तू विष्णूच्या आहेत, हे त्यांनी पाहताक्षणीच ओळखले. भयभीत होऊन त्यांनी विचारले, "पुत्रा चर्पटी! काय भानगड झाली? या सर्व वस्तू कुठून आणल्यास?" चर्पटी सांगू लागला, "तातश्री, सहज म्हणून देवराज इंद्राच्या बागेत खेळत असतांना मला बागेतल्या माळयांनी धरून मारले. म्हणून मी त्यांना ठार मारले, त्यांचा कैवार घेऊन इंद्र, हरिहर झुंजावयास आले. मी शांत चित्ताने युद्ध करून त्यांनाही लोळविले

आणि त्यांचा देहावरील आभूषणे घेऊन आलो आहे." ते ऐकून ब्रम्हदेव भयाने धास्तावले, त्याला पोटाशी धरून म्हणाले, "चर्पटी, श्रीविष्णू हा माझा पिता आणि तुझा आजोबा आहे. श्रीशिव म्हणजे माझ्यासह सर्व जगताचे आराध्य दैवत आहे. ते जर गतप्राण झाले तर जगाचा कारभार कसा चालणार? आपल्या जगण्यालाही अर्थ राहणार नाही. चल, उठ लवकर आणि त्यांना सावध कर आणि तसं करणार नसशील तर मला ही ठार कर आणि माझ्या अंत्यसंस्कार करून जा." ते ऐकून चर्पटीनाथांना फारच वाईट वाटले. हात जोडून ते म्हणाले, "मी सर्वांना उठवितो. तुम्ही दुःखी होऊ नका." मग ब्रम्हदेव आणि चर्पटीनाथ अमरपुरीत गेले. हरी हराची ती अस्ताव्यस्त मलीन अवस्था पाहून ब्रम्हदेवांच्या नेत्रांतून आश्रू धारा वाहू लागल्या. कळवळून ते म्हणाले, "चर्पटी यांना त्वरित सावध कर." नाथांनी वातप्रेरक अस्त्राने सर्वांचे श्वास मोकळे केले. जे गतप्राण झाले होते त्यांना संजीवनी मंत्राने सजीव केले. सार्वजण सुखरूप उठल्याचे पाहून ब्रम्हदेवाने आनंदाने चर्पटीला मिठी मारली. स्वतःच्या हाताने त्याला हरिहराच्या चरणांवर घालून क्षमायाचना केली. तेव्हा विष्णूंनी विचारले, "माझी आभूषणे धारण करून शोभिवंत दिसणारा हा कोण आहे?" मग ब्रम्हदेवांनी चर्पटीनाथाची जन्म कथा सांगितली. ती ऐकून ते म्हणाले, हा माझाच वंश असल्याने सुदर्शन याला वश झाले असावे."

पश्चाताप दग्ध चर्पटीने स्वतः आभूषणे काढून श्रीविष्णूंना दिली. त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवून क्षमा मागितली. चर्पटी हा पिप्पलायन असल्याचे सर्वांना समजले, कपालपात्र घेऊन श्रीशिव कैलासात गेले. श्रीविष्णू वैकुंठात आणि देवेंद्र अमरपुरीत गेले. चर्पटीला घेऊन ब्रम्हदेव सत्यलोकात गेले. "नारायण! नारायण!!" करीत नारद इंद्रदेवाकडे गेले. तेव्हा देवेंद्राने खाली मान घातली. चर्पटीसह ब्रम्हदेव सत्यलोकात पोहोचले होते. पाठीमागून नारदमुनीही येऊन पोहोचले. ते दोघे बंधू एकजीवाने तेथे राहू लागले. उत्तम पर्वणीच्या वेळी, एकवीस स्वर्गाचे लोक मणीकर्णिकेत स्नानासाठी जमले होते. त्यावेळी ब्रम्हदेव स्वतः चर्पटीला घेऊन गेले. पितापुत्रांनी एकत्र स्नान करून पुण्यसंचय केला. पाहता पाहता एक वर्ष निघून गेले. सर्वांचा निरोप घेऊन चर्पटीनाथ निघून गेले. नारदाच्या गमनकला विद्याचा उपयोग करून नाथ पाताळलोकात गेले. भोगावतीच्या पाण्याने स्नान करून सप्त पाताळातील सर्व तीर्थे पाहिली. बळीराजाचा पाहुणचार स्वीकारून वामनाला वंदन केले. नाथांच्या सर्व इच्छा पूर्ण झाल्यावर ते पुन्हा भूमीवर अवतीर्ण होऊन भ्रमंती करू लागले. त्रिखंडात चर्पटीनाथांनी पाहिले नाही असे आता कोणतेही स्थान राहिले नव्हते.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने युद्धात विजय मिळेल.